गोंदिया या नवनिर्मित जिल्ह्याच्या ठिकाणी नविन कारागृह बांधण्यासाठी खाजगी जमीन संपादीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

शासन निर्णय, क्रमांक : बांधका ०१२१/प्र.क्र.१०६/पीआरएस-२,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : ३० मार्च, २००५.

**वाचा :** १) कारागृह महानिरीक्षक, पुर्व विभाग, नागपूर यांचे पत्र क्र. बांधकाम/गोंदिया/७५७३/२००४/पू.वि.११, दिनांक २.११.२००४.

२) मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने याचिका क्र. १७६/२००२ मध्ये दिनांक २५ नोव्हेंबर, २००४ रोजी दिलेले आदेश.

३) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र. पुरक-१०.०५/प्र.क्र.८/२००५/अर्थसंकल्प-३, दि. ३०.३.२००५.

४) शासन पत्र, गृह विभाग क्र.एसयुपी-११०५/पुमा/अर्थसंकल्पिय अधिवेशन/प्र.क्र.१५/बीयुडी-१, दि. ३०.३.२००५

**शासन निर्णय :-** गोंदिया या नवनिर्मित जिल्ह्याच्या ठिकाणी नवीन कारागृह बांधण्याची आवश्यकता आहे. तसेच मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने याचिका क्र. १७६/२००२ मध्ये दिनांक २५ नोव्हेंबर, २००४ रोजी दिलेल्या आदेशामध्ये राज्यातील कारागृहामध्ये क्षमतेपेक्षा जास्त बंदी ठेवण्यात आले असून गोंदिया या ठिकाणी नविन कारागृह तातडीने बांधण्याचे आदेश दिले होते. गोंदिया या ठिकाणी कारागृह बांधण्यासाठी सुयोग्य अशी शासकीय जमीन नसल्याने जिल्हाधिकारी, गोंदिया यांनी कारागृह बांधण्यासाठी योग्य असे तीन जमीनीचे प्रस्ताव शासनास सादर केले होते. कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तीनही जमीनींची पाहणी करुन मौजे कारंजा, ता.जि. गोंदिया येथील गट क्र. ८७३ व इतर यामधील एकुण २२.२७ हेक्टर भूसंपादनाचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. जिल्हाधिकारी, गोंदिया यांनी ठरवून दिलेल्या प्रमाणे सदर २२.२७ हेक्टर क्षेत्राच्या भूसंपादनासाठी

येणाऱ्या रु. ७०,७२,४२०/- (रुपये सत्तर लाख बहात्तर हजार चारशे वीस फक्त) इतक्या खर्चास याद्वारे शासन मंजुरी देत आहे.

यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. बी-९-अ, ४०७०-इतर प्रशासकिय सेवा यावरील भांडवली खर्च, ८००-इतर खर्च, (००)(०१) कारागृहासाठी जमीन संपादन व बांधकामावरील खर्च (४०७०-०१३-१) दत्तमत / योजनेतर" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो सन २००४-०५ या वर्षी केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सीआर१४१/०५/व्यय-८ दिनांक १६.०२.२००५ अन्वये दिलेल्या मंजुरीसाठी निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

आगपरदेशी

( आ. ग. परदेशी )

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक, पुर्व विभाग, नागपूर.

महालेखापाल, (महालेखापाल / लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.

जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई.

अवर सचिव (बीयुजी-१), मंत्रालय, मुंबई.

निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

**********************